# क्रासिन्सकीच्या चौकात मांजरी



लेखन: कैरन हैस, चित्र: वैण्डी वॉटसन

मराठी : अश्विनी बर्वे

# क्रासिन्सकीच्या चौकात मांजरी

लेखन: कैरन हैस

चित्र: वैण्डी वॉटसन

मराठी : अश्विनी बर्वे



मांजरी दारांच्या फटीतून,

अंधाऱ्या कोपऱ्यातून

आणि कचऱ्याच्या ढिगातून येतात.



त्यांना माहीत आहे की मी त्यांना फक्त माझा कोमल स्पर्श, प्रेमाचा आवाज देऊ शकते. पण माझ्याजवळ येण्याशिवाय त्यांच्याकडे दुसरा कोणताच मार्ग नाही. कधी त्या दुसऱ्या कोणाच्या तरी होत्या.

त्या सोफ्यांच्या उश्यांवर झोपत असत,

स्फटिकाच्या ताटल्यामध्ये खात,

त्या हळूहळू गुरगुरत

आपल्या नखांनी छाती ओरबाडत असत. त्यांच्यावर प्रेम करणाऱ्याच्या गळ्यात पडत असत.

पण आता त्याचे मऊशार डोकं गोंजरणारे,पापी घेणारे कोणी नाही.

मी कुजबुजत म्हणते, “तुम्हांला खायला घालायला काही नाही माझ्याकडे!”

पण मांजरांना त्याची पर्वा नव्हती.

माझा थोडासा पाव, पनियल सूप आणि बटाटे मी ठेवू शकते.

ते खूप जास्त आहे जे माझा मीटर मायकेल ला घेट्टो (नाझींनी यहुदीसाठी तयार केलेली वस्ती ) च्या भिंतीतून मिळत असे.

त्यांना गरज नाही की मी काही खायला घालू,

खाण्यासाठी त्यांच्याकडे खुप सारे उंदीर होते.





दिवसाच्या प्रकाशात मी मांजरांबरोबर खेळत असे, तेव्हा वॉरसॉच्या कोणत्याही सामान्य मुलीसारखी मी वाटे.

मी यहूदी असल्याचा प्रचार करणारा तो पट्टा त्या चिंध्यासोबत त्यावेळी जळून गेला होता. जेव्हा मी घेट्टोमधून वाचून बाहेर पडले होते.

मी आजकाल मुखवट्या सारखा माझा पोलिश चेहरा घालून राहते.
मी पोलिश चाल चालते.
माझ्या ओठांतून पोलिश शब्द निघतात.,
आणि मी थोडी बहुत सुरक्षित आहे
जवळजवळ अदृश्य - सारखी
क्रासिन्सकी चौकातल्या फिरणाऱ्या झोक्यावर झोके घेत,
चकरा मारणाऱ्या मुलींच्या जवळून जात
मी कमीतकमी सुरक्षित आहे.

माझी शूर बहीण

मीरा,

परिवारात फक्त तीच वाचली आहे.

माझी शूर बहीण एक योजना तयार करते

ही तिची सगळ्यात ताजी योजना आहे,

घेट्टोमध्ये तस्करी करून अन्न पोहचवण्याची योजना.

तिचे मीटर रेल्वेने येतील,

त्याच्याजवळ झोळ्या असतील.

ज्यात

कपड़े वा पुस्तके नाही तर पाव, ओट्स

आणि साखर भरलेली असेल.





मला पक्क माहीत आहे की घेट्टोच्या दारांच्या फटी कुठे ठीक आहेत. मांजरांनी त्याचा सुगावा दिला आहे. मीराचे मीटर आरिकने तयार केलेल्या नकाशावरून मी त्यांची जागा सांगते. “प्रत्येक फटीत खाण्याचे सामान भरले जाईल,” मीरा म्हणाली.

ती चुलीवर आमचे पातळ -पनियल सूप उकलत होती.

मी तिला क्रासिन्सकी चौकाची ती जागा सांगते की जिथून पाव गुपचूप आत पोहचवला जाऊ शकतो. ती जागा ज्याच्या दाराच्या दुसऱ्या बाजूला मायकेल राहत होता. मीराला धोका चांगलाच माहित होता. पण ती मानेने हो म्हणत होती.मी अंथरूणावर पसरले, आणि त्या मोठ्या खोलीत प्रकाश नाचू लागला.

पण त्या ठरवलेल्या दिवशी

ज्यावेळी रेल्वे वॉरसॉकडे येत होती.

आरिक आमच्या खोलीत अचानक घुसला.

त्याला धाप लागली होती, तो सांगत होता की गैस्टापो (नाझी पोलीस) ला रेल्वे आणि झोळी याबद्दल कळले आहे. ते आपले कुत्रे घेऊन स्टेशनवर हजर होतील. म्हणजे कुत्री वास घेऊन तस्करांना शोधून काढतील.

आरिक आणि मीरा डोळ्यातून जे बोलत होते ते मला रात्री उशिरा दरवाज्यावर पडणाऱ्या थापेपेक्षा अधिक भीतीदायक वाटत असे.



आम्ही मांजरी वाटून घेतल्या.

एक-एक करून

मीरा आणि आरिक, हेनरिक आणि मारेक, हाना आणि आना, लोसेलो आणि स्टासिन,

आम्ही मांजरांना टोपल्यामध्ये एकत्र करत होतो.





आम्ही स्टेशनकडे निघालो.

तिथं आम्ही इकडेतिकडे पसरून गेलो.

रेल्वे येण्याची वाट बघत,

गैस्टापो आणि त्यांचे गुरगुरणाऱ्या कुत्र्यांच्या मागे

अचानक वाफ आणि शिट्टीच्या आवाजा बरोबर
रेल्वे स्टेशनवर येऊन थांबली.
प्रवासी उतरत आहेत.
कुत्री सोडली गेली. त्या बायका आणि पुरुषांच्याकडे
मुलांना आणि मुलींना पकडू लागले,
ज्यांच्याकडून पाव, ओट, आणि साखरेचा वास येत होता.
पण त्यांच्या पर्यंत कुत्रे त्यांच्यापर्यंत पोहचतील.



आम्ही आमच्या
टोपल्या उघडून
मांजरी सोडून
दिल्या.

स्टेशनवर गोंधळ झाला.
क्रोधीत कुत्रे आपली भूक
मांजराकडे वळवत. मांजरे
सगळीकडे धावत, त्या
दरवाज्याच्या फटीतून निघून
जात. अंधारात गायब होत,
मोकळ्या जागेतुन पळून जात.



तस्करीकडून आणलेलं सामान

स्टेशनवरून लगेच गायब होत असे. आमच्या कडच्या वॉरसॉहून गायब होत असे.

भिंतीतून, भिंतीच्यावरून, भिंती खालून सगळं काही घेट्टोमध्ये पोहचत असे.

पोहचलेल्या सामानाने माझी एक टोपली सुधा भरली. ज्यात एक पाव मायकेल साठी.

धन्यवादाचे त्याचे हात हातात आहेत.

मग चक्रीच्या झोक्याचे संगीत हवेत तरंगत आहे आणि क्रासिन्सकीच्या चौकावर एक रुपेरी आभा पसरली आहे.



## लेखिकेच्या लेखणीतून

२००१ मध्ये मी एक छोटास लेख वाचला होता. ज्यात द्वितीय विश्व युद्धाच्या दरम्यान त्या घटनेबद्दल लिहलेले होते, ज्यात वॉरसॉच्या रेल्वेस्टेशन वर कशा प्रकारे मांजरांनी  गैस्टापोना वाईट पद्धतीने थकवले होते. ही गोष्ट माझ्या डोक्यात आतपर्यंत बसली होती.या गोष्टीने मला मजबूर केले की मी पोलंडला जाऊन वॉरसॉच्या घेट्टो आणि तिथल्या यहुदींच्या द्वारे केलेला नाझींच्या विरोधाची चौकशी करावी. तिथं मला दोन महत्वपूर्ण स्त्रोत मिळाले होते - *रिंगलब्लूम आर्काइव्स आणि*  अडीना ब्लेडी श्वाइगरचे पुस्तक *“आय रिमेम्बर नथिंग मोर“* - क्रासिन्सकी चौकात मांजरी या शिर्षकाने लिहलेल्या या पुस्तकातील काल्पनिक मोठी बहीण मीराच्या पात्राची प्रेरणा मला अडीना ब्लेडी श्वाइगर कडून मिळाली. ही कथा काल्पनिक आणि त्यातलं सत्य यहूदींच्या द्वारे नाझींना केलेला विरोधाच्या अनुभवावर आधारित आहे.

## ऐतिहासिक तथ्य

सप्टेंबर १९३९ मध्ये म्हणजे द्वितीय विश्व युद्धाच्या सुरुवातीला पोलंडची राजधानी वॉरसॉवर जर्मनीने हल्ला केला आणि ते काबिज़ केलं. गैस्टापो (जर्मन पोलीस) नी यहुदी स्त्री-पुरुष आणि मुलांना वॉरसॉकडे आणि त्याच्या आजूबाजूच्या इलाख्यात ढकलले आणि त्यांना ठरवलेल्या जागेत, घेट्टोमध्ये राहण्यास मजबूर केले. त्या इलाख्यात असणाऱ्या गैर-यहूदीना आदेश दिले गेले की त्यांनी आपले घर खाली करावे. तेव्हा घेट्टोच्या चारी बाजूला विटांच्या भिंती उभ्या केल्या म्हणजे यहूदी आणि गैर-यहूदी एक-दुसऱ्यापासून वेगवेगळे राहतील. तोपर्यंत सगळेच्या सगळे यहूदी एकत्र करून वॉरसॉच्या या घेट्टोमध्ये पोहचवले गेले, तेव्हा तिथली लोकसंख्या एवढी वाढली होती की घेट्टो रोग आणि भुकेने त्रस्त झाले होते. रोज शेकडो बायका, पुरुष आणि मुलं घेट्टोच्या रस्त्यावर बेशुद्ध अवस्थेत पडत. कारण ते एक पाऊलही चालू शकत नसत आणि तिथंच त्यांना मृत्यू येई.

जुलै १९४२ मध्ये जर्मनीने वॉरसॉच्या यहुदींना दुसऱ्या ठिकाणी पोहचवायला सुरुवात केली. सगळ्यात लहान आणि सगळ्यात बुजुर्ग लोक घेट्टोतून गायब होऊ लागले. आधी रोज २००० लोक, मग १०,०००, त्यानंतर २०,००० लोक. जे सगळ्यात अशक्त होते त्यांना वॉरसॉ सोडण्याच्या आधीच मारले जाई. शेवटी घेट्टो पूर्णपणे रिकामा केले गेले.फक्त त्या लोकांशिवाय जे हत्यारांच्या कारखान्यात काम करते होते.

खरंतर ते शरीर आणि मनाने थकले होते, काही यहुदींनी नाझींना विरोध केला. हज़ारों बहादुर युवक, युवतींनी नाझींच्या योजना असफल करण्याचा प्रयत्न केला. त्यांनी विरोधी समूह तयार केला. जेव्हा शक्य होईल तेव्हा त्यांनी नाझींच्या समोर संकटे उभी केली. स्वतःला धोका सूनही ते लोकांना घेट्टोच्या बाहेर काढत आणि हत्यार, खाण्याच्या वस्तू आणि औषधे त्यांच्यापर्यंत आत पोहचवत. अशा प्रकारे त्यांनी हजारो यहुदींना वाचवलं.

ऑगस्ट १९४३ मध्ये जेव्हा वॉरसॉ घेट्टोच्या शूर योद्धयांनी शेवटची झडप घातली, जर्मन सेना प्रत्येक ठिकाणी चांगल्या स्थितीत होती. याशिवाय मुठभर आजारी, बुकेने अर्धमेले आणि घायळ घेट्टोवासियांनी जर्मन सेनेचा सामना चाळीस दिवस केला. जर्मन सैनिकांनी बॉम्ब टाकून, घेट्टोच्या इमारतींना आग लावली. त्यांना आपण हरवू शकत नाही हे माहित असूनही यहुदीं आपला हल्ला चालू ठेवला. ते मरेपर्यंत जर्मन सैनिकांशी लढत राहिले.

नक्की प्रत्येक यहुदी मारला गेला नाही. जे यहुदी पोलिश असल्याकारणाने घेट्टोच्या भिंतीपलीकडच्या त्या ‘आरियान’ वस्तीत राहू लागले होते, त्यांनी शेकडो यहुदींना घेट्टोतून काढायला मदत केली. मानेपर्यंत घाण आणि दुर्गंधीने भरलेल्या वॉरसॉच्या नाल्या पार करत त्यांना मुक्त केले. युद्ध संपल्यावर घेट्टोतून वाचलेले लोक शेवटी बाहेर आले. त्यांनी नाझींच्या रानटीपणा सगळ्यासमोर आणला.



क्रासिन्सकी चौकातल्या मांजरी सुधा कधीतरी कोणाच्या होत्या.

आणि ती मुलगी पण,जिचा परिवार युद्धात मारला गेला.युद्धाच्या धामधुमीत ती मुलगी आणि तिची मोठी बहीण कसं तरी जिवंत राहण्याचा प्रयत्न करते होते. तरीही त्यांनी आपला जीव धोक्यात घालून त्या लोकांना मदत केली जे वॉरसॉच्या त्या बदनाम घेट्टोच्या भिंतीच्या आत फसले होते.